महाराष्ट्र अभियांत्रिकी (स्थापत्य) सेवा मुख्य परीक्षा-२०२० मधील सहायक अभियंता, श्रेणी-१ (स्थापत्य), गट-अ या पदावर नामनिर्देशनाने तात्पुरती नियुक्तीबाबत.....

# महाराष्ट्र शासन

**जलसंपदा विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : नियुक्ती २०२२/प्र.क्र.७६/आ(संनि),**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- १३ ऑगस्ट, २०२४

**संदर्भ :** १) महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई यांचे पत्र क्र.३७४(२)/ स्थापत्य/२०२१/१९, दि.१७.०८.२०२२
२) महाराष्ट्र शासन, जलसंपदा विभाग, शासन निर्णय क्र. नियुक्ती २०२२/प्र.क्र.७६/आ(संनि), दि.१७.११.२०२३.
३) महाराष्ट्र शासन, जलसंपदा विभाग, शासन निर्णय क्र. नियुक्ती २०२२/प्र.क्र.७६/आ(संनि), दि.२८.१२.२०२३.

## शासन निर्णय

महाराष्ट्र अभियांत्रिकी सेवा परीक्षा-२०२० च्या अंतिम निकालाच्या आधारे महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने पुढील उमेदवारांची जलसंपदा विभागात सहायक अभियंता श्रेणी-१ (स्थापत्य), गट-अ या पदावर शिफारस केली आहे.

| अ.क्र. | गुणानुक्रमांक | शिफ़ारस प्राप्त उमेदवाराचे नाव |
|---|---|---|
| १. | १२ | श्रीमती अस्मिता अजित पाटील |
| २. | १३ | श्रीमती आरती हनुमंत वाडकर |
| ३. | १४ | नरेंद्र बाबासाहेब तेलोरे |
| ४. | ८ | अक्षयकुमार गोरखराव साळुंखे |

सदरहू शिफारशीस अनुसरुन शासन निर्णय समक्रमांक दि.१७.११.२०२३ व दि.२८.१२.२०२३ अन्वये उक्त नमुद उमेदवारांची उक्त पदावर विहित अटी व शर्तीच्या अधीन राहून तात्पुरती नियुक्ती करण्यात आली असून दिनांक ०१.०१.२०२४ रोजी महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी, नाशिक येथे प्रशिक्षणासाठी रूजू होण्याचे आदेशित करण्यात आले होते. श्रीमती अस्मिता अजित पाटील यांनी सहाय्यक अभियंता श्रेणी-१ (स्थापत्य), गट-अ या पदावर वैयक्तिक कारणास्तव रुजू होऊ शकत नसल्याबाबत कळविले आहे. तथापि, श्रीमती आरती हनुमंत वाडकर, नरेंद्र बाबासाहेब तेलोरे व अक्षयकुमार गोरखराव साळुंखे यांनी ते प्रशिक्षणास हजर होणार आहेत किंवा कसे, याबाबत शासनास अवगत केलेले नाही. तसेच विहित मुदतीनंतर सेवेत रुजू होण्यासाठी मुदतवाढीसाठी शासनाकडे अर्जही केलेला नाही. यास्तव शासन निर्णय, समक्रमांक दिनांक १७.११.२०२३ व दि.२८.१२.२०२३

अन्वये श्रीमती अस्मिता अजित पाटील, श्रीमती आरती हनुमंत वाडकर, श्री. नरेंद्र बाबासाहेब तेलोरे व श्री. अक्षयकुमार गोरखराव साळुंखे यांची सहायक अभियंता श्रेणी-१ (स्थापत्य) गट-अ या पदावर करण्यात आलेली तात्पुरती नियुक्ती या शासन निर्णयान्वये रद्द करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०८१३१७१४१२९७२७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

ANIL VITTHAL DEOKATE

Digitally signed by ANIL VITTHAL DEOKATE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, 2.5.4.20=0243d4781b79f364761efde22e15161622e87986fb431d9cbc0ecc6469d5e203, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9A8B949B82C94F286DC79EF74BFCAE2A4E204E31853685E98B0B86C438C888E9, cn=ANIL VITTHAL DEOKATE
Date: 2024.08.13 17:29:18 +05'30'

**( अनिल वि. देवकाते )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१) अ.मु.स. (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
२) सचिव, मा. उपमुख्यमंत्री (जलसंपदा) यांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
३) सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
४) सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
५) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग. (पत्राने)
६) महासंचालक, संकल्पन, प्रशिक्षण व संशोधन, महाराष्ट्र अभियांत्रिकी संशोधन संस्था, नाशिक.
७) महालेखापाल-१/२, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
८) महालेखापाल-१/२, लेखा परीक्षा, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
९) संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१०) उप सचिव (सेवा)/(प्रशासन), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) अधीक्षक अभियंता व सह संचालक, महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी, नाशिक.
१२) कक्ष अधिकारी, कार्यासन आ(वर्ग-१)/आ(वर्ग-२)/आ(प्रशिक्षण)/गोपनीय/नोंदणी शाखा, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१३) संग्रहार्थ/कार्यासन आ(संनि).